**<u>बदली</u>**
**उप अभियंता (स्थापत्य)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलटीएस २०१८/प्र.क्र.१९ /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १५.६.२०१८

**<u>शासन आदेश :-</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होण्याऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम ४ (४) (एक) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री. राजेश लुंगे, उप अभियंता, जि.प.(बां) उप विभाग, वाशिम यांची बदली सा.बां.उप विभाग, वाशिम या पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री.लुंगे, उप अभियंता यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. श्री. लुंगे यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही. याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केलयास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री.लुंगे यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्याचा रजेचा अर्ज स्वीकारु नये/ मंजूर करु नये.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१५१८०४३५३५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Jagannath Kamble

Digitally signed by Arvind Jagannath Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, serialNumber=9002cefc24afd7333b681924b5ec78d113291ff4a25db398420a06cd457d41f5, cn=Arvind Jagannath Kamble
Date: 2018.06.15 18:03:23 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम
४. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
५. श्री.राजेश लुंगे, उप अभियंता यांना मुख्य अभियंता, सा. बां. प्रादेशिक विभाग,अमरावती यांच्या मार्फत.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम)/मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री (सा.बां.), (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (रस्ते/ बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
७. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.